“नगरपरिषद वैशिष्ट्यपूर्ण कामे” योजनेअंतर्गत अमळनेर नगरपरिषद, जि. जळगाव यांना निधी वितरीत करण्याबाबत.

सन २०१५-१६ साठी लेखाशिर्ष (२२१७ ०९१३) खाली रक्कम रू. ४.५ कोटी.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४४/नवि-१६
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ आक्टोंबर, २०१५

वाचा :-(१)शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. संकीर्ण-१०२०००/प्र.क्र.४०/२०००/नवि-४, दिनांक २५ फेब्रुवारी,२०००

(२)शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. जीईएन-२००७/८७३/नवि-१६, दिनांक १६ फेब्रुवारी,२००८ व दिनांक ६ सप्टेंबर,२०१३

(३)वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३,दिनांक १७ एप्रिल,२०१५.

(४)वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-संकीर्ण-२०१५/ प्र. क्र. ३४ /कोषा. प्र.शा.५ दिनांक २४ जुलै,२०१५

(५) शासन पत्र क्रमांक संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४४/नवि-१६ दिनांक २५ ऑगस्ट ,२०१५

(६) जिल्हाधिकारी, जळगाव यांचे पत्र क्र.पालिका-३/कावि/७४४/२०१५ दि.९ आक्टोंबर,२०१५

**प्रस्तावना :-**

राज्यातील नगरपालिकांना “वैशिष्ट्यपूर्ण” कामांसाठी विशेष अनुदान देण्यात येते. सदर योजनेचे निकष संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले आहेत. संदर्भाधीन क्रमांक (२) येथील शासन निर्णयान्वये सदर योजनेअंतर्गतच्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. संदर्भाधीन क्र. (५) येथील शासन पत्रान्वये रक्कम रूपये पाच कोटीच्या मर्यादेत प्रशासकीय व तांत्रिक मान्यतेचा

प्रस्ताव जिल्हाधिकारी,जळगाव यांचेकडून मागविण्यात आला असता, रक्कम रू.५,०५,७७,४८१/- चा प्रस्ताव तांत्रिक मान्यतेसह संदर्भाधीन क्र. (६) येथील पत्रान्वये शासनास प्राप्त झाला आहे.संदर्भाधीन क्र. (३) व (४) येथील वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार "नगरपरिषद वैशिष्ट्यपूर्ण कामे" योजनेअंतर्गत अमळनेर नगरपरिषदेच्या क्षेत्रातील "नाट्यगृहाच्या विविध विकास कामासाठी" अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अमळनेर नगरपरिषदेच्या क्षेत्रातील "नाट्यगृहाच्या विविध विकास कामासाठी" "नगरपरिषद वैशिष्ट्यपूर्ण कामे" या योजनेअंतर्गत रक्कम रु.४,५०,००,०००/- ( अक्षरी रक्कम रुपये चार कोटी पन्नास लक्ष मात्र ) इतका निधी वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर प्रकल्प खर्चाचा ९०% हिस्सा राज्य शासनाचा व १०% हिस्सा अमळनेर नगरपरिषदेचा राहणार आहे. तथापि, शासनाने प्रकल्प खर्चाची मर्यादा रक्कम रूपये पाच कोटी मर्यादीत केली असल्याने राज्य शासनाचा ९०% हिस्सा म्हणून रक्कम रु.४,५०,००,०००/- ( अक्षरी रक्कम रुपये चार कोटी पन्नास लक्ष मात्र ) इतका निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे

३. सदर प्रकल्पाअंतर्गत निश्चित करण्यात आलेल्या कामांना रक्कम रू.५,०५,७७,४८१/- (अक्षरी रक्कम रूपये पाच कोटी पाच लक्ष सत्त्यांतर हजार चारशे एक्क्यांशी मात्र) च्या मर्यादेत सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त झाली असल्याची खातरजमा जिल्हाधिकारी, जळगाव यांनी करून घ्यावी व तद्नंतरच सदरचा निधी आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडे वर्ग करण्यात यावा.

४. सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांसाठी कार्यान्वित यंत्रणा अमळनेर नगरपरिषद राहील. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचा निधी आहरीत करून सदरच्या कार्यान्वित यंत्रणेस वितरीत करावा.

५. सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांच्या "ई-निविदा" अंती प्रकल्प खर्च निश्चित करण्यात यावा. सदरचा प्रकल्प खर्च हा तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या प्रकल्प खर्चापेक्षा जास्तीचा असल्यास, अशा जास्तीच्या खर्चासाठी

कुठल्याही स्वरुपात अतिरिक्त अनुदान शासनाकडून उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६. "ई-निविदा" अंतीचा प्रकल्प खर्च हा तांत्रिक व प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या प्रकल्प खर्चापेक्षा कमी असल्यास, सदर कमी झालेल्या खर्चाच्या राज्य शासन हिस्स्याची रक्कम शासनास जमा करावी. सदरची जबाबदारी आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

७. सदर प्रकल्पासाठी निश्चित करण्यात आलेल्या हिस्स्यानुसार राज्य शासनाने उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाने त्यांच्या हिस्स्याचा निधी संबधित खात्यात जमा करणे बंधनकारक राहील.सदर प्रकल्पाव्यतिरीक्त अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी संबधित खात्यातून राज्य शासनाचा अथवा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या हिस्स्याची रक्कम खर्च करू नये.

८. सदर प्रकल्पासाठी खात्यातून खर्च करताना, प्रकल्पासाठी निश्चित करण्यात आलेल्या हिस्स्यानुसार राज्य शासनाचा व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा त्या त्या प्रमाणात खर्ची करणे बंधनकारक राहील.

९. <u>जिल्हाधिकारी, जळगाव यांची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील:-</u>

(अ) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे ही सार्वजनिक मालकीच्या ठिकाणीच करावीत, कामाचे स्वरुप सार्वजनिक असावे, तसेच त्यामुळे सर्वसमावेशक नागरिकांच्या प्राथमिक सोयी सुविधांमध्ये भर पडणार आहे याची पुन्हा खातरजमा करणे व कुठल्याही खाजगी स्वरुपाच्या कामांना मान्यता देण्यात आली नसल्याची खातरजमा करणे.

(ब) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे सबंधित शहराच्या विकास नियंत्रण नियमावली व विकास आराखडयाशी सुसंगत असल्याची खातरजमा करणे.

(क) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांना "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करणे बंधनकारक राहील.याबाबत सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच शासनाने निर्गमित केलेल्या अद्यावत मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. "ई-निविदा" कार्यप्रणालीचा अवलंब करण्यात येत असल्याची खातरजमा करणे.

(ड) सदर प्रकल्पाअंतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात येत असल्याचे, काम गुणवत्तेनुसार झाले आहे किंवा कसे तसेच मंजूर कामावरच मंजूर निधी खर्च झाला आहे किंवा कसे हे पाहणे.

(इ) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामावर करण्यात येणा-या खर्चामुळे आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही हे पाहणे.

(ई) निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे व नियमांचे तसेच विहीत प्रक्रियेचे अवलंबन करण्यात यावे. निधी खर्च करण्याबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयातील सूचनांचा व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत (Financial Power) भंग होणार नाही तसेच, कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही हे पाहणे.

१०. <u>कार्यान्वित यंत्रणेची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील:-</u>

(अ) सदर प्रकल्पाअंतर्गत दुरूस्तीची तथा परिरक्षणाची कामे हाती घेण्यात येत नाहीत हे पाहणे.

(ब) सदर प्रकल्पाअंतर्गतची कामे सुरू करण्यापुर्वीच्या स्थितीचे व काम झाल्यानंतरच्या कामाचे चित्र (Photograph) काढून ठेवणे व मागणीनुसार सादर करणे.

(क) सदर प्रकल्पाअंतर्गतच्या कामांचे त्रयस्थ पक्षाकडून लेखापरिक्षण करून घेणे कार्यान्वित यंत्रणेस बंधनकारक राहील.

**११.** यापुर्वी या योजनेखाली झालेल्या खर्चाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचेकडे जिल्हाधिकारी, जळगाव यांनी तात्काळ पाठवावीत.

**१२.** सदर शासन निर्णयान्वये उपलब्ध करून दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित प्रपत्रात संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकडून उपलब्ध करून घेऊन, संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, जळगाव यांची राहील.तसेच, उपयोगिता प्रमाणपत्राची एक प्रत आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांचेकडे सादर करावी.

**१३.** दिनांक ३१ मार्च २०१७ अखेर ही निधी खर्च करण्याची मुदत संपल्यानंतर आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांनी या लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ करीता वितरीत करण्यात येणा-या सर्व निधीच्या उपयोगिताचे प्रमाणपत्र प्राप्त करून घ्यावे. सदरची उपयोगिताचे प्रमाणपत्र एकत्रितरीत्या संबंधित महालेखापाल कार्यालयाकडे सादर करून खर्चित व अखर्चित निधीचा अहवाल शासनास सादर करावा.

**१४.** यासंबंधीचा खर्च मागणी मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (४२) नगरपरिषदांना वैशिष्ट्यपूर्ण कामासाठी विशेष अनुदान (वेतनेतर) (२२१७ १३०१), ३१, सहाय्यक अनुदान, या लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**१५.** उपरोक्त नमूद केल्यानुसार निधीचे वितरण करण्यासाठी जिल्हाधिकारी, जळगाव यांना नियंत्रक अधिकारी तसेच, जिल्हा प्रशासन अधिकारी,जळगाव यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**१६.** संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये “नगरपरिषद वैशिष्ट्यपूर्ण कामे” या योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, सदर शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती बंधनकारक राहतील. सदरच्या अटी व शर्तींची पुर्तता झाल्यानंतर व प्रकल्पास सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतरच सदरचा निधी आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडे वर्ग करण्यात यावा.

**१७.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ करीता निधी वितरीत केला असल्यास सदर निधीपैकी ७५% खर्चाचे विनियोग झाले असल्याची खातरजमा आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी व असे उपयोगिताचे प्रमाणपत्र देयकासोबत जिल्हा कोषागारात सादर करावे

**१८.** या लेखाशिर्षाखाली यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत याची खातरजमा आहरण व संवितरण अधिका-याने करावी.असे गंभीर आक्षेप असल्यास निधी आहरीत करू नये.

**१९.** या लेखाशिर्षाखाली एक वर्षावरील जुने तपशीलवार देयक असल्यास निधी आहरीत करू नये.असे प्रस्ताव वित्त विभागाची सहमती घेण्यासाठी नगर विकास विभागाकडे पाठविण्यात यावेत.

**२०.** आहरण व संवितरण अधिका-याने सदरचे आहरीत करण्यात येणारे अनुदान तात्काळ संबधितास वितरीत करावे. सदरचे अनुदान दिनांक ३१ मार्च २०१७ अखेर खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी. दिनांक ३१ मार्च २०१७ अखेरचा अखर्चित निधी संबधितांनी व्याजासह शासनाच्या खाती तात्काळ जमा करावा.

**२१.** "नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना निधी वितरीत करण्यापूर्वी सदर संस्थाकडून राज्य शासनास येणे असणा-या रकमांचा आढावा जिल्हाधिकारी, जळगाव यांनी घ्यावा व अशा रकमा वसूल करण्याबाबत आहरण व संवितरण अधिका-यास सूचित करावे.शासनास अशा येणे असणा-या रकमा वसूल करूनच उर्वरित निधी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस वितरीत करावा व वसूल केलेल्या रकमा शासनाच्या योग्य लेख्याखाली जमा करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिका-याने करावी.अशा कपात करण्यात आलेल्या रकमांमुळे प्रकल्प अपूर्ण राहणार नाही याची दक्षता घेण्याबरोबरच, अशी कपात केलेली रक्कम प्रकल्प पुर्ततेसाठी उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील.

**२२.** संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयानुसार प्रशासकीय मान्यता/तांत्रिक मान्यता देण्यात आल्याची खातरजमा करावी. त्याचप्रमाणे वितरीत करण्यात येणारा निधी ठेव बांधकाम स्वरूपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करू नये.

**२३.** या शासन निर्णयान्वये निधी वितरीत करावयाच्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे या लेखाशिर्षाखाली यापुर्वी वितरीत केलेला निधी अखर्चित असल्यास, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ व शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय दिनांक ६ जून,२००८ अन्वये कार्यवाही करावी.

**२४.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दिनांक १७ एप्रिल,२०१५ मधील सोबतच्या परिशिष्टाच्या अ.क्र. (९) मधील तपासणी सूचीतील अ.क्र. (५),(६),(७),(८) व (९) तसेच, शासन परिपत्रकामधील परिच्छेद (७) ते (१८) पैकी परिच्छेद क्र. (७),(८),(९),(१२),(१३),(१५), (१६) व (१८) लागू होत नाहीत.तसेच, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्र.शा.५ दिनांक २४ जुलै,२०१५ च्या परिच्छेद (अ) मधील अ.क्र. (६),(८),(९) व (१०) लागू होत नाहीत.उर्वरीत बाबींची उपरोक्त परिच्छेदांनुसार पुर्तता करण्यात आली आहे.

**२५.** वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.-अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दिनांक १७ एप्रिल,२०१५ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**२६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१५१८३१२६९३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = UNDER SECRETARY
Date: 2015.10.15 19:48:28 +05'30'

(विवेक कुंभार)

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
३. विभागीय आयुक्त,नाशिक
४. जिल्हाधिकारी, जळगाव
५. मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव
६. मुख्याधिकारी,अमळनेर
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव
१३. वित्त विभाग, व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन नवि-४ नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (नवि-१६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.